न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एफएसएल-०४१५/प्र.क्र.१३/पोल-४.**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक २५ मार्च, २०१५.

**वाचा:**

१) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५

२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१४/व्हीआयपी २८४/प्र.क्र.३६२/१२, दिनांक २६.११.२०१४

३) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक मुं/का/७३९५/१४, दि.२४.१२.२०१४

**प्रस्तावना:**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध करण्यासाठी तरतूद करण्याकरीता अधिनियम २००५, अंमलात आला आहे. या अधिनियमातील कलम-६ मध्ये गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्या करण्यास सक्षम प्राधिकारी निश्चित करण्यात आलेले आहेत. सदर अधिनियमातील कलम-६ मधील परंतुक २ व कलम ७ मधील तरतूदीनुसार न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५, च्या कलम-६ मधील परंतुक २ व कलम ७ नुसार न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांची बदली करण्याचे अधिकार खालीलप्रमाणे प्रत्यार्पित करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | शासकीय अधिकाऱ्यांचे गट व पदनाम (पाचव्या वेतन आयोगातील वेतनश्रेणीनुसार) | सुधारीत वेतनश्रेणी | महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकारी | बदली करण्याचा अधिकार प्रत्यार्पित करावयाचा अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | उपसंचालक गट-अ (रु.१०,६५०-१५,८५० व त्यापेक्षा अधिक वेतनश्रेणी असलेले गट-अ मधील सर्व अधिकारी) | रू.१५६००-३९१०० ग्रेड पे ६९०० | मा. मुख्यमंत्री | अपर मुख्य सचिव (गृह) |
| २ | सहायक संचालक, गट अ (रू.१०,६५०-१५,८५० पेक्षा कमी वेतनश्रेणी असलेले गट-अ मधील सर्व अधिकारी) | रू.१५६००-३९१०० ग्रेड पे ६६०० | मा. मंत्री (गृह) | संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई |
| ३ | सहायक रासायनिक विश्लेषक व प्रशासकीय अधिकारी, गट-ब (गट-ब मधील सर्व अधिकारी) | रू.९३००-३४८०० ग्रेड पे ४४०० | मा. मंत्री (गृह) | संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई |

२. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५, नुसार सविस्तर मार्गदर्शक सूचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२६१५४६०३७७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Surendra Ambadas Deshmukh

Digitally signed by Surendra Ambadas Deshmukh
DN: CN = Surendra Ambadas Deshmukh, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.03.27 15:03:42 +05'30'

**( सु. अं.देशमुख )**
**अवरसचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय मुंबई.

३. मा.राज्यमंत्री (गृह) (शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. मा.राज्यमंत्री (गृह) (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

५. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग, मुंबई.

६. संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

७. सह संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

८. सर्व उपसंचालक व उपसंचालक, प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, नागपूर/ पुणे/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती / कोल्हापूर/नांदेड.

९. सर्व सहायक संचालक/ सहायक रासायनिक विश्लेषक/ प्रशासकीय अधिकारी

१०.सामान्य प्रशासन विभाग, (कार्यासन-१२), मंत्रालय, मुंबई.

११.उप सचिव (आस्था-१), गृह विभाग, १२ वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.

१२.निवडनस्ती/गृह विभाग (पोल-४).